**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**क्रमांकः ससप्र ११२३/प्र.क्र.१३३/प्रशा-१ (का-१४)**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २८ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ** : शासनाचे समक्रमांकाचे दि.३१.०७.२०२४ रोजीचे आदेश.

## आदेश

श्रीमती सरिता रि. बांदेकर-देशमुख, सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय यांची संदर्भाधीन आदेशान्वये, वैदयकीय शिक्षण व औषधी द्रव्ये आणि सार्वजनिक आरोग्य विभागातील रिक्त पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोग कार्यालयात निर्माण करण्यात आलेल्या स्वतंत्र कक्षातील अवर सचिवाचे एक पद तात्पुरत्या स्वरूपात **सह सचिव** या पदामध्ये श्रेणी उन्नत करून, सदर पदावर प्रथमत: ३ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली होती.

२. आता या आदेशान्वये, श्रीमती सरिता रि. बांदेकर-देशमुख, सह सचिव यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बेलापूर कार्यालयातील **परीक्षा नियंत्रक व सह सचिव** या पदावर खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रथमत: ३ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे

(अ) श्रीमती सरिता रि. बांदेकर-देशमुख, सह सचिव ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्वीकारतील, त्या तारखेला समाप्त होईल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन / सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे, अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

३. म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परि.-२) मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती विचारात घेऊन, श्रीमती बांदेकर-देशमुख यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, सामान्य प्रशासन विभागाच्या कार्यासन आस्था-१ व कार्यासन मलोआ यांनी आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

४. श्रीमती सरिता रि. बांदेकर-देशमुख, सह सचिव यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सामान्य प्रशासन विभाग /कार्यासन आस्था-१ यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

५. श्रीमती सरिता रि. बांदेकर-देशमुख, सह सचिव यांनी, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बेलापूर कार्यालयातील परीक्षा नियंत्रक व सह सचिव या प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार तात्काळ स्विकारावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२८१२४०१४३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.02.28 12:53:06 +05'30'

**( ग. स . परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अ.मु.स/प्र.स., मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अध्यक्ष, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बेलापूर.
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बेलापूर .
६. सह/उप सचिव (मलोआ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई .
७. सह /उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. श्रीमती सरिता रि. बांदेकर-देशमुख, सह सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बेलापूर.
९. निवडनस्ती प्रशा-१ (का-१४).